**अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत सहभागी होणाऱ्या होतकरु खेळाडूंना प्रशिक्षण व इतर बाबींसाठी आर्थिक सहाय्य देणेबाबत.**
**निधी वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो २०१६ /प्र.क्र. ६४ /क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २९ मार्च, २०१७.

वाचा:-

१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. क्रीडाधो ३११३/ प्र.क्र.२९/ क्रीयुसे-३ दि. २८ एप्रिल, २०१४.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसं-३,दि.२० एप्रिल,२०१६.
३) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.आंखेआस/ प्रतिपूर्ती/प्रस्ताव/२०१६-१७/का-६/४२१ दि. २० जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील खेळाडूंनी आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करुन पदक विजेते खेळाडू तयार व्हावेत तसेच राज्यातील खेळाडूंना अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भाग घेण्यासाठी प्रोत्साहन मिळावे यासाठी शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. क्रीडाधो ३११३/ प्र.क्र.२९/ क्रीयुसे-३ दि. २८ एप्रिल, २०१४ अन्वये आर्थिक सहाय्य देण्यात येते. सन २०१६-१७ या कालावधीत प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.५००.०० लक्ष इतक्या तरतुदीपैकी वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकानुसार ८० % च्या मर्यादेतील रु. ४००.०० लक्ष इतक्या निधीपैकी रू. ३०,५३,२६१/- इतक्या निधीच्या वितरणास शासन निर्णय दि. २५ जानवोरी, २०१७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. श्री. दत्तू भोकनळ व प्रार्थना ठोबरे या दोन खेळाडूंना रिओ ऑलिंपिक स्पर्धेच्या पूर्वतयारीसाठी प्रत्येकी रु. ५.०० लक्ष याप्रमाणे राज्य क्रीडा विकास निधीच्या लेखाशिर्ष (२२०४ २०८२) मधून वितरीत करण्यांत आलेले रु. १०.०० लक्ष इतक्या निधीची प्रतिपूर्ती करण्याची बाब, पॅरा ऑलिंपिक स्पर्धेतील सहभागी खेळाडू सुयश जाधव यास मंजूर रु.५.०० लाख व विविध आंतरराष्ट्रीय स्पर्धांत भाग घेणारे ८ खेळाडू यांना मंजूर करण्यांत आलेले रु. १५,६९,४३२/- असा एकूण रु. ३०,६९,४३२/- इतका निधी वितरीत करण्याची बाब या नस्तीच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ या वर्षाकरीता राज्यातील खेळाडूंना अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेत भाग घेऊन अत्युत्कृष्ट कामगिरी करण्याकरिता प्रोत्साहन मिळावे तसेच याअनुषंगाने येणाऱ्या इतर बाबीं विचारात घेऊन त्यांना आर्थिक सहाय्य करता यावे यासाठी रु. ५००.०० लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु. ३०,६९,४३२/- (अक्षरी रुपये तीस लाख एकोणसत्तर हजार चारशे बत्तीस फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४, (०८)(०४) युवा धोरणांतर्गत युवा पुरस्कार (२२०४ ५६५३) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.५. परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१५२७३१२१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.29 15:29:46 +05'30'

( कि. ल. संखे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२. मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वरीष्ठ कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे.
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
८. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
९. निवडनस्ती, क्रीयुसे-३.